सीसीटीएनएस प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडुन प्राप्त रु.२१,९२,४६,०००/- एवढा निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-३६१६/प्र.क्र.-८१/भाग-१/पोल-३,
मंत्रालय , २ रा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ जानेवारी, २०१७.

वाचा:-१) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.४९(३)//PF-I/२०१४-१५१०, दि. २८/३/२०१६.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.४९(३)/PF-I/२०१४-१५१३, दि. ३१/३/२०१६.
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. २२०११/२३(१५)/२०१०-SR(CCTNS)/३९, दि. २८/९/२०१६.
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. २२०११/०७/२०१०-SR(CCTNS)/४२, दि. ३०/९/२०१६.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.पूरक-२०१६/प्र. क्र. २०१/ अर्थसंकल्प-३,दि.४.१.२०१७.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजनेअंतर्गत राज्यात सीसीटीएनएस प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पाव्दारे राज्यातील सर्व पोलीस ठाणी व सर्व वरिष्ठ पोलीस कार्यालये CAS (Core Application Software ) सॉफ्टवेअरव्दारे जोडण्यात आली आहेत. सीसीटीएनएस प्रकल्प संपूर्णपणे (१००%) केंद्र पुरस्कृत असून सदर प्रकल्पासाठी केंद्र शासनाने दि.२८.०३.२०१६, दि.३१.०३.२०१६, दि.२८.०९.२०१६ व दि.३०.०९.२०१६ रोजीच्या विविध आदेशान्वये रु.२१,९२,४६,०००/- (रुपये एकवीस कोटी ब्यान्नव लाख शेहचाळीस हजार फक्त) एवढा निधी राज्य शासनास वितरित केला आहे. सदर निधी सीसीटीएनएस प्रकल्पाच्या विविध कामासाठी खर्च करण्यात येणार आहे. सदरचा निधी राज्य शासनास प्राप्त झाल्यामुळे तो खर्च करण्यासाठी या योजनेसंबंधित लेखाशिर्षामध्ये सन-२०१६ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीव्दारे तरतुद करण्यात आली आहे. सदर निधी महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई यांना वितरित करणे आवश्यक आहे. त्यानुसार सीसीटीएनएस प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडुन प्राप्त रु.२१,९२,४६,०००/- ( रुपये एकवीस कोटी ब्यान्नव लाख शेहचाळीस हजार फक्त ) एवढा निधी महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :

केंद्र शासनाच्या ई-गव्हर्नन्स योजने अंतर्गत राज्यात राबविण्यात येणाऱ्या सीसीटीएनएस प्रकल्पासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त रु.२१,९२,४६,०००/- ( रुपये एकवीस कोटी ब्यान्नव लाख शेहचाळीस हजार फक्त) एवढा निधी सह व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई यांना वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी “मागणी क्र. ब-१, २०५५- पोलीस,(००) १०९- जिल्हा पोलीस (००), (००) (११) गुन्हा व गुन्हेगारी माग काढण्यासाठी नेटवर्क यंत्रणा (२०५५ ०६२२), (योजनांतर्गत) ३१-सहायक अनुदाने ( वेतनेत्तर ) ” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. सदर निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तर त्यांच्या अंतर्गत आहरण व संवितरण अधिकाऱ्याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुसार आहरण व संवितरण अधिकाऱ्याने सदर निधी कोषागारातून आहरित करुन या निधीचा धनादेश सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई यांच्या नावाने काढावा व तो सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावा.

४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई यांनी सदर निधी सीसीटीएनएस प्रकल्पांतर्गत करण्यात आलेल्या कामासाठी केंद्र शासनाच्या निदेशानुसार खर्च करावा व खर्च करण्यात आलेल्या रकमेची उपयोगिता प्रामाणपत्रे वेळोवेळी शासनास सादर करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ५२१/१६/व्यय-७, दि.१६.११.२०१६ अन्वये वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११६१७१३११८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas Arjun Gaikwad

Digitally signed by Kailas Arjun Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kailas Arjun Gaikwad
Date: 2017.01.16 17:17:11 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
उप सचिव, गृह विभाग,

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.राज्यमंत्री, गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
५. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
६. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई

१०.अपर पोलीस महासंचालक (नि. व सं.) , महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११.अपर पोलीस महासंचालक ,राज्य गुन्हे अभिलेख कक्ष, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य,पुणे.

१२.सह व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ,मुंबई.

१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१४.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

१५. वित्त विभाग, व्यय-७/ वित्तीय सुधारणा.

१६.अवर सचिव, अर्थ-२ ,गृह विभाग.

१७.निवडनस्ती, पोल-३.